

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्र. संकीर्ण-६०२१/प्र.क्र.६२/ना.पु.१५**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०२२.

**विषय :- कै. संतोष जयहिंद भालेराव, माथाडी कामगार, अन्नधान्य वितरण कार्यालय, पुणे यांचा कोरोनाच्या सार्वत्रित साथीमध्ये कोव्हीड-१९ चा संसर्ग होऊन मृत्यू झाल्याने त्यांच्या वारसदारांना रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबत.**

**संदर्भ** :-१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१.
२) जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्र.पलस/कावि/१४२/२०२०, दि.९/११/२०२०
३) अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे यांचे क्र.अविअ/गोहि/कावि/४२९/२०२१, दि.२५/६/२०२१.

**ज्ञापन :-**

जिल्हाधिकारी, पुणे यांच्या अधिपत्याखालील अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे अंतर्गत शासकीय धान्य गोदाम, फुरसुंगी येथे कार्यरत कै. संतोष जयहिंद भालेराव (माथाडी कामगार) यांचा कोव्हीड-१९ च्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने उद्भवलेल्या परिस्थितीमध्ये अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे यांच्या आदेशानुसार कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) **"प्रतिबंधात्मक उपाययोजना"** अंतर्गत जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा करण्यासाठी शासकीय धान्य गोदाम, फुरसुंगी, पुणे येथे उपस्थित राहून वाहनात धान्य उतरविण्याचे व चढविण्याचे कर्तव्य पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक १८/०७/२०२० रोजी मृत्यू झाला आहे.

२. जिल्हाधिकारी, पुणे यांनी उक्त मृत माथाडी कामगार कै.भालेराव यांच्या वारसदारांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९/०५/२०२० अनुसार रु.५०,००,००० (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. **अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे** यांच्या दिनांक २४/०३/२०२० रोजीच्या आदेशान्वये कै. भालेराव यांची कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) प्रतिबंधात्मक उपाययोजना अंतर्गत जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा करण्यासाठी शासकीय धान्य गोदाम, फुरसुंगी, पुणे येथे उपस्थित राहून वाहनात धान्य उतरविणे व चढविणेकरिता नेमणूक करण्यात आली होती.

४. जिल्हाधिकारी, पुणे व सहायक अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे यांनी कै. संतोष भालेराव हे मृत्युच्या तारखेपूर्वी १४ दिवस नियमित म्हणजेच दिनांक १३/०७/२०२० रोजी दुपारपर्यंत कर्तव्यावर हजर होते व शासकीय धान्य गोदाम फुरसुंगी, पुणे येथे कोरोना विषाणू (कोव्हिड-१९) प्रादुर्भाव रोखणेसाठीचे **"प्रतिबंधात्मक उपाययोजना"** अंतर्गत जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा करण्याबाबतचे कर्तव्य बजावत होते, असे प्रमाणित केले आहे.

५. रुबी हॉल क्लिनिक, पुणे यांनी कै. संतोष भालेराव यांना "कोव्हीड -१९" चा संसर्ग झाल्याचे निदान केले आहे.

६. पुणे महानगरपालिका अंतर्गत **ससून सर्वसाधारण रुग्णालय, पुणे** यांनी कै. संतोष भालेराव यांचा मृत्यू हा "कोव्हीड -१९" या रोगाच्या संसर्गामुळे झालेला आहे, असे प्रमाणित केले आहे.

७. त्यानुसार, जिल्हाधिकारी, पुणे यांच्या अधिपत्याखालील अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय पुणे यांच्या आस्थापनेवर कार्यरत कर्मचारी कै. संतोष भालेराव (मयत माथाडी कामगार) यांच्या नामनिर्देशित वारसदारांना रक्कम रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. उक्त खर्च "मागणी क्र.एम-२, प्रधान लेखाशीर्ष २४०८-अन्न,साठवण व वखार, उप प्रधान शीर्ष १०१-प्रापण व पुरवठा, गौण शीर्ष (०३), प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण अंतर्गत "(०३)(०२) मुफसल (अनिवार्य) (२४०८ ०१०८) या उपलेखाशीर्षाखाली १३ - कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१२५१६५९५२४९०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.01.25 17:00:54 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, पुणे**

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) आहरण व संवितरण अधिकारी, अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, पुणे.
२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

**प्रत माहितीस्तव-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय,पुणे.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई.
४) वित्तीय सल्लागार व उपसचिव,अ.ना.पु.व.ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
५) श्रीम. सारिका संतोष भालेराव,बी-९७, रुम नं.७, सुपर इंदिरा नगर, बिबवेवाडी ,जि.पुणे. (मार्फत : जिल्हाधिकारी, पुणे)
६) निवडनस्ती, ना.पु.१५.